**प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (सर्वसाधारण) घटकांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा दुसरा भाग निधी रु.७३५,२७,०२,०००/- व राज्य समरुप हिस्सा रु.४९०,१८,०१,३३३/-एवढा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२५/प्र.क्र.२९/योजना-१०**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख : २० फेब्रुवारी, २०२५.

<u>वाचा</u> :-

१) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/१/२०२४-RH-Pol.(३८९४८०) दि.१८.०२.२०२५ रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र.जा.क्र. राव्यक-ग्रागृ/ लेखा (प्रआयो)/1st installment/सर्वसाधारण/२०२५/४८०, दि.१८.०२.२०२५.

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दि.०८.०१.२०२५.

**<u>शासन निर्णय</u>:-**

प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र शासनाने सन २०२४-२५ या वर्षासाठी पहिल्या हप्त्याचा दुसरा भाग म्हणून रू.२६९१२७.०० लाख एवढा निधी वितरीत केला आहे. सदर निधीस रु.१७९४१८.०० लाख एवढा राज्य समरुप हिस्सा अनुज्ञेय आहे. परंतु, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र हिश्श्यांतर्गत रू.७३५२७.०२० लाख एवढा निधी तसेच राज्य हिश्श्यांतर्गत रू.४९०१८.०१३ लाख एवढा निधी उपलब्ध असल्याने, सदर उपलब्ध तरतुदीमधून, प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) सर्वसाधारण घटकांतर्गत सन २०२४-२५ या वर्षामध्ये केंद्र शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा दुसरा भाग रू. ७३५२७.०२० लाख एवढा निधी व राज्य

(कृ.मा.प.)

हिस्सा रू. ४९०१८.०१३ लाख एवढा निधी असे एकूण रु.१२२५४५.०३३ लाख इतका निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी सन २०२४-२५ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा व केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१) प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०४) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) - सर्वसाधारण (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्राचा हिस्सा ६० %) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने, (वेतनेतर) (२५०५३०१२), या लेखाशिर्षाखाली करुन त्याखालीच खर्ची टाकण्यात यावा. तसेच राज्य शासनाच्या हिश्श्याचा निधी मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१) प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०१) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) - सर्वसाधारण (राज्याचा हिस्सा ४० %) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने, (वेतनेतर) (२५०५ ०५६८), या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण ही योजना केंद्र पुरस्कृत असल्याने, या शासन आदेशाद्वारे वितरीत होणारा निधी संबंधित योजनेच्या Single Nodal Agency (SNA) खात्यामध्ये वर्ग करण्यात यावा.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

५. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण - गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयक ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

६. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२४ निधी वितरणाबाबतच्या दिनांक ८ जानेवारी, २०२५ च्या शासन परिपत्रकातील, केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरणाबाबतच्या अटी व शर्तीनुसार तसेच विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२०१०४५५२०३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANGEETA MADAN KHOLGADGE

Digitally signed by SANGEETA MADAN KHOLGADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7736f254e7550bbb9fe5a91ee61214c90d51f1a8c6f9f11ac72483ab7aa9d69d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=83DE86408C50C73CCF3F7BB3C747E6CEB249A1DDF2F026EC32694DF4BBBBD4A9, cn=SANGEETA MADAN KHOLGADGE
Date: 2025.02.20 10:57:01 +05'30'

**( सं. म. खोलगाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, ४ था मजला, दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे .
४) कोषागार अधिकारी (सहायक संचालक संवर्ग), उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
५) नियोजन विभाग (का.१४४४) , मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
८) निवड नस्ती (योजना-१०).